**सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात एकत्रित परिविक्षाधिन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी) ९ अंतर्गत सहकार विभागामार्फत १० गट अ संवर्गातील परिविक्षाधीन अधिकारी सहभागी असल्याने त्यांच्या तांत्रिक प्रशिक्षणापोटी खर्चीत प्रशिक्षण शुल्काची रक्कम वितरीत करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**शासन ज्ञापन क्र. प्रशिक्ष ०२२५/प्र.क्र. ४५/५-स**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक - २४ मार्च, २०२५

<u>ज्ञापन :-</u>

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात एकत्रित परिविक्षाधिन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी) ९ अंतर्गत तांत्रिक प्रशिक्षण दिनांक २३.०१.२०२४ ते दिनांक १८.०३.२०२४ या कालावधीत यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेमार्फत आयोजीत करण्यात आले. सदर प्रशिक्षण कार्यक्रमात विभागामार्फत १० गट अ संवर्गातील परिविक्षाधीन अधिकारी सहभागी असल्याने तांत्रिक प्रशिक्षणापोटी खर्चीत प्रशिक्षण शुल्काची रक्कमेपैकी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाकडील कार्यक्रम खर्चाच्या योजनेअंतर्गत मंजूर निधीपैकी रु. १९.६० लाख (रु. एकोणीस लाख साठ हजार फक्त) एवढा निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर खर्च मागणी क्रमांक व्ही-०२, मुख्यलेखाशिर्ष ३४५१ - सचिवालयीन -आर्थिक सेवा अंतर्गत उपलेखाशिर्ष (३४५११२९०६) ००३, प्रशिक्षण (००) (०१) शासकीय कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण या लेखाशिर्षाअंतर्गत, ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून करण्यात यावा.

०३. या ज्ञापनान्वये मंजूर करण्यात आलेल्या रकमेचे आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्यासाठी श्री. सु.पु. पांगारकर, कक्ष अधिकारी (रोखशाखा), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे. तसेच श्री. नितिन गायकवाड, उप सचिव (रोखशाखा), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात आले आहे. या ज्ञापनान्वये मंजूर केलेली रक्कम अधिदान व लेखाधिकारी, मुंबई येथून आहरित करुन संबंधितांना वितरीत करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी व नियंत्रण अधिकारी यांनी करावी.

०४. सदर ज्ञापन वित्त विभागाने अनौपचारीक संदर्भ क्रमांक १५१/२०२५/व्यय-२ दिनांक १८.०३.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार डिजिडल स्वाक्षरीद्वारे साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत असून त्यांचा संकेतांक २०२५०३२४१७३९३७९७०२ आहे. सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRAVIN RAJARAM MUNDHE

Digitally signed by PRAVIN RAJARAM MUNDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f2250646a3997378536c4aaa7d636fcdb30a0b8f8913330badb8710a501fc1c5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DC78036626EC580D66C0AC502D43AF5F670B5BA13F51213AD071ACD53714A284, cn=PRAVIN RAJARAM MUNDHE
Date: 2025.03.24 17:40:30 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-२, नागपूर.
४) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
५) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
६) संबंधीत कोषागार अधिकारी.
७) महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे
८) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१३/ व्यय-२), मंत्रालय, मुंबई.
९) अवर सचिव (कार्यासन १७-स), सहकार, पणन वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती (कार्यासन ५-स).

**प्रत**

१) प्रधान सचिव (सहकार व पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.